**जिल्हा रुग्णालय, धुळे, येथे १०० खाटांचे स्त्री व बाल रुग्णालयाच्या दुरुस्तीच्या कामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०१८/प्र.क्र.२६१/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २७ एप्रिल, २०२३.

वाचा :

१) **सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालये राज्यस्तर मुंबई यांचे पत्र क्रमांक : संआसे/कक्ष-३/टे-६/स्त्रीरुधुळे१००खाटासुधाप्रमा/१९८४१-४२/२२, दिनांक०१.१२.२०२२**

२) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय समक्रमांक दि.२१.१२.२०१८**

**प्रस्तावना :**

जिल्हा रुग्णालय, धुळे, येथे १०० खाटांचे स्त्री व बाल रुग्णालयाच्या दुरुस्तीच्या कामाचे रु.३६३.८१/- लक्ष एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रक व नकाशांना उपरोक्त वाचा येथील अ.क्र. २ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. जिल्हा रुग्णालय धुळे येथे १०० खाटांचे स्त्री व बाल रुग्णालय दुरुस्तीच्या कामामध्ये मुख्य इमारत दुरुस्ती, नवीन प्रसादन गृहाचे बांधकाम करणे, आर.सी.सी. गटार बांधणे, ५०,००० ली. क्षमतेची ईएसआर चे बांधकाम करणे, संरक्षण भिंत बांधणे, अंतर्गत रस्ते, जनरेटर, झाडे लावणे, व इतर सुशोभिकरण, १८ टक्के जी.एस.टी., मजुरांचा विमा खर्च, विदयुतीकरण, आकस्मिक खर्च व भववाढ इ. बाबींची वाढ झाल्याने रु.९,६४,६८,४५५/- इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रक व आराखडयास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :

जिल्हा रुग्णालय, धुळे, येथे १०० खाटांचे स्त्री व बाल रुग्णालय येथील रु. रु.९,६४,६८,४५५/- (नऊ कोटी चौशाष्ट लक्ष आडुसष्ट हजार चारशे पंचावन्न फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रक व आराखडयास खालील प्रमाणे सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | मूळ प्रशासकीय मान्यता | सुधारित प्रशासकीय मान्यता | फरक | अधिक्याची कारणे |
|---|---|---|---|---|---|
| अ. | १. मूळ बाबी (आकस्मिक खर्चासह) १.मुख्य इमारत दुरुस्ती | १,९१,३६,०००/- | ४,५३,८१,२१९/- | २,६२,४५,२१९ | विभागाच्या मागणीनुसार उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञांनी दि.०१.१२.२०२१ रोजी प्रत्यक्ष पाहणी करुन झालेल्या बदलामुळे रक्कमेत वाढ झाली. |
| | २.नवीन प्रसाधनगृह बांधणे | २०,००,०००/- | ३६,०८,६८१ | १६,०८,६८१ | |
| | ३.बाहेरील गटारीचे बांधकाम | ५,००,००० | १०,१७,६४७, | ५,१७,६४७ | |
| | ४.नवीन संरक्षण भिंत | ३३,६०,००० | ८९,१३,५७६ | ५५,५३,५७६ | |
| | ५.रस्त्याची दुरुस्ती | २५,००,००० | २०,०८,८६० | (-)४,९१,१४० | |
| | ६. GST १२% आत सु.प्र.मा. १८% | ३८,६३,५२० | १,४४,३६,८५६ | १,०५,७३,३३६ | |
| | ७.विमा खर्च व इतर | ३,२१,९६० | १२,०३,०७२ | ८,८१,११२ | |
| | १. नवीन बाब-भाववाढ | | ७५,२९,६१२ | ७५,२९,६१२ | नव्याने १२% भाववाढ |
| | २. झाडे लावणे व इतर | | १४,५०,००० | १४,५०,००० | |
| | **एकूण अ** | **३,१६,८१,४८०** | **८,५५,४९,५२३** | **५,३८,६८,०४३** | |
| ब | विद्युत | | | | |
| | १. जनरेटर | २२,००,००० | २२,००,००० | -- | |
| | २.११% विद्युतीकरण | ---- | ६९,०२,१४५ | ६९,०२,१४५ | आतील व बाहेरील ११ % तरतुद केली. |
| | **एकूण ब** | **२२,००,०००** | **९१,०२,१४५** | **६९,०२,१४५** | |
| क | **पाणी पुरवठा** | | | | |
| | **ESR ५०००० लि. क्षमता** | **२५,००,०००** | **१८,१६,७८७** | **(-)६,८३,२१३** | |
| | **एकूण क** | **२५,००,०००** | **१८,१६,७८७** | **(-)६,८३,२१३** | |
| | **एकूण अ,ब, क** | **३,६३,८१,४८०** | **९,६४,६८,४५५** | **६,००,८६,९७५** | |

०२. **अटी व शर्ती :-**

१) कामा सुरु करण्याण्यापूर्वी आवश्यकतेनुसार मुख्य अभियंता, (स्थापत्य) व मुख्य अभियंता (विद्युत) सार्वजनिक बांधकाम विभाग यांची कार्यात्मक अंदाजपत्रकास मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) बांधकामासाठी उपलब्ध होणाऱ्या नियतव्ययामधून सदर कामास निधी उपलब्ध करुन देण्याच्या अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

४) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाच्या किंमतीमध्ये अनावश्यक वाढ करण्यात येवू नये.

५) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्यात्या- क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल.

६) स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

७) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

८) सुधारीत प्रशासकीय मान्यता देतांना सन २०१९-२० चे निविदा दर विचारात घेण्यात आले असल्याने त्यानुसार कार्यात्मक अंदाजपत्रक तयार करुन एक वर्षाच्या आत बांधकाम पूर्ण करणे संबंधित कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग यांना बंधनकारक राहिल.

९) क्षेत्रियस्तरावर सदर बांधकामाचा संबंधित उपसंचालक आरोग्य सेवा व जिल्हा शल्य चिकित्सक यांनी वेळोवेळी आढवा घ्यावा.

१०) रुग्णालया इमारती बांधकाम करतांना फायर सेफ्टी नॉर्म नुसार रुग्णालयातील इमारतीचे Planning National Building code vol-१ मधील Part ४ Fire and safety नुसार केले असल्याबाबत खातरजमा करावी.

११) अंदाजपत्रक व नकाशे संबंधित मुख्य वास्तुशास्त्र व मुख्य अभियंता (स्थापत्य/विदयुत) यांचेकडून तपासून घेणे आवश्यक आहे.

०३. उपरोक्त १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील.

०४. जिल्हा रुग्णालय, धुळे, येथे १०० खाटांचे स्त्री व बाल रुग्णालयाच्या दुरुस्तीच्या कामाचे कामावरील खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष ""४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य-( पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, ११०- रुग्णालय व दवाखाने, (१)(अ( पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१०००१४), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात यावा.

०५. जिल्हा रुग्णालय, धुळे, येथे १०० खाटांचे स्त्री व बाल रुग्णालयाच्या दुरुस्तीच्या कामासाठी लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

०६. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये व सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपचारी संदर्भ क्रमांक ५३/२३ इमा-२ दिनांक १३.०३.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२०२०२७०७६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: CN = ASHOK MAROTI ATRAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH DEPARTMENT
Date: 2023.04.27 17:10:27 +05'30'

**( अशोक आत्राम )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, आयुक्तालय आरोग्य भवन मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (रुगणालय राज्यस्तर), मुंबई.
६. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला
७. वैद्यकीय अधिक्षक स्त्री रुग्णालय, धुळे.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, धुळे.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, धुळे.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.धुळे.
११. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (आरोग्य-३).